**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूर पाणीपुरवठा योजनांच्या कामास मुदतवाढ देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१९/प्र.क्र.१०५/पापु-१९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १० ऑगस्ट, २०२०

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण भागांतील दीर्घकालीन गरजांचा व आरोग्याचा विचार करुन ग्रामीण जनतेस पुरेसे व शुध्द पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याकरिता संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात "मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (MRDWP)" राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार पाणीपुरवठा योजनांची कामे पूर्ण करण्याकरिता २४ महिन्यांचा कालावधी (नियोजन ते बहिर्गमनापर्यंत) निश्चित करण्यात आला आहे. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या अंमलबजावणीतील विलंब कमी करण्याच्या उद्देशाने मंजूर पाणीपुरवठा योजनांच्या कामांना आवश्यकतेनुसार मुदतवाढ देण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूर पाणीपुरवठा योजनांच्या कामांना तांत्रिक/अपरिहार्य कारणास्तव मुदतवाढ देणे आवश्यक असल्यास अशा योजनांच्या कामास मुदतवाढ देण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्रदान करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१०१११७४०६१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.08.10 12:48:05 +05'30'

**(वसंत. भि. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
८) मुख्य /अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद (सर्व).
११) निवड नस्ती (पापु-१९)